**संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. सीओएन २०२२/प्र.क्र.१९/प्रशासन-१**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- ०४ एप्रिल, २०२२.**

संदर्भ : १) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. सीओएन-२०२१/प्र.क्र.६६/प्रशासन-१ दि. ३० सप्टेंबर, २०२१

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दि.२२ फेब्रुवारी, २०२२.

३) संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे दि.१४ मार्च, २०२२ रोजीचे पत्र.

**शासन निर्णय -:**

उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील अस्थायी पदे दि. ०१ सप्टेंबर, २०२१ ते दि. २८ फेब्रुवारी, २०२२ पर्यंत चालू ठेवण्यात आली होती.

२. आता या शासन निर्णयान्वये संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील सोबत दर्शविलेल्या विवरणपत्रानुसार नियमित अस्थायी आस्थापनेवरील ०९ पदे व रुपांतरित अस्थायी आस्थापनेवरील ११८ पदे सहा महिन्यांपेक्षा जास्त काळ रिक्त नाहीत, या अटीच्या अधीन राहून **दिनांक ०१ मार्च, २०२२ पासून दिनांक ३१ ऑगस्ट, २०२२ पर्यंत** चालू ठेवण्यास शासन मंजूरी देत आहे.

३. या बाबीवरील संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयातील पदांच्या वेतनाचा खर्च हा -२४०६-वनीकरण व वन्यजीवन-०२-पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन -११२-सार्वजनिक उद्याने (१) अधीक्षक, उपवने व उद्याने (२४०६०८०१)॰ या लेखाशिर्षाखालील चालू वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि २०१६/ प्र.क्र.८/ १६/ आ.पु.क. दि. २२ फेब्रुवारी, २०२२ या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०४०४१५३१२७२८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vikram Nivrutti Dhamal

Digitally signed by Vikram Nivrutti Dhamal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=23b2f1b1fd914a87080cb68712db5efd17f65e69284fe1d3274a32de69eb6a25, serialNumber=10d36944a4b86eab516b1b70183709c5fb570cfdf5a52755adfef51ed380b836, cn=Vikram Nivrutti Dhamal
Date: 2022.04.04 15:35:02 +05'30'

**( वि.नि.ढमाळ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**१) महालेखापाल-१ (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल-२ (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई.
४) संबंधित कोषागार / उप कोषागार अधिकारी
५) वित्त विभाग (व्यय-११) / (आ.पु.क.) मंत्रालय, मुंबई.
६) कार्यासन अधिकारी, सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) कार्यासन अधिकारी, प्रशासन१-, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई. (**निवडनस्ती).**

## विवरणपत्र (१) नियमित अस्थायी आस्थापनेवरील पदे

| अ. क्र. | कार्यालयाचे नाव | दि.२८/०२/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेल्या अस्थायी पदांची संख्या. | दि.२८/०२/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेल्या अस्थायी पदांमध्ये झालेली वाढ. | दि.२८/०२/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेल्या अस्थायी पदांमध्ये झालेली घट | दि.०१/०३/२०२२ पासून दि.३१/०८/२०२२ पर्यंत मुदतवाढ द्यावयाच्या पदांची संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | संचालक, उपवने व उद्याने, मुंबई | १८ | ० | ०९ | ०९ |
| | **एकूण** | **१८** | **०** | **०९** | **०९** |

## विवरणपत्र (२) रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील पदे

| अ. क्र. | कार्यालयाचे नाव | दि.२८/०२/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेल्या अस्थायी पदांची संख्या. | दि.२८/०२/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेल्या अस्थायी पदांमध्ये झालेली वाढ. | दि.२८/०२/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेल्या अस्थायी पदांमध्ये झालेली घट | दि.०१/०३/२०२२ पासून दि.३१/०८/२०२२ पर्यंत मुदतवाढ द्यावयाच्या पदांची संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | संचालक, उपवने व उद्याने, मुंबई | ३७ | ८२ | ०१ | ११८ |
| | **एकूण** | **३७** | **८२** | **०१** | **११८** |